महाराष्ट्र पर्यावरण अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक या संस्थेने आयोजित केलेल्या प्रशिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी या संस्थेला वेतनेतर अनुदान वितरीत करण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.१४८/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख : ३१ मार्च, २०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक टिआरएन-२००९/प्र.क्र.३९/२००९/१२-अ, दिनांक २३.०९.२०११
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः टिआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/१४/१२-अ, दिनांक १.११.२०१४.
३) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आस्था-४९२१/प्र.क्र.२०९/पापु-०१, दिनांक २८.०९.२०२१
४) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४२४/प्र.क्र.१४८/पापु-२३, दिनांक २५.१०.२०२४
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १२.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन (१) च्या शासन निर्णयान्वये राज्य प्रशिक्षण धोरण २०११ घोषित केले आहे. त्यानुषंगाने पाणीपुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र पर्यावरण अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक या संस्थेला विभागाची राज्यस्तरीय प्रशिक्षण संस्था म्हणून संदर्भाधीन (३) च्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आले आहे. या संस्थेकडून आयोजित करण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाचे दर हे राज्य प्रशिक्षण धोरणाच्या दरानुसार ठेवण्याची तरतूद संदर्भाधीन दिनांक २८.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. त्यानुषंगाने मीत्रा या संस्थेने

सन २०२४-२५ मध्ये आयोजित केलेल्या प्रशिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी या संस्थेला अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णयः-**

भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा व महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांमधील अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी महाराष्ट्र पर्यावरण अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक या संस्थेने आर्थिक वर्ष सन २०२४-२५ मध्ये आयोजित केलेल्या प्रशिक्षणाच्या खर्चापोटी या संस्थेला रुपये ३५,८७,५००/- (अक्षरी रुपये पस्तीस लाख सत्त्याऐंशी हजार पाचशे फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच श्री. रा.म.गेंगजे, उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. "संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी निधी आहरित केल्यानंतर तात्काळ सदर निधी मीत्रा, नाशिक या संस्थेकडे ऑनलाईन पद्धतीने हस्तांतरीत करावा. या शासन निर्णयान्वये ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टांतर्गत वितरीत करण्यात येत असलेले अनुदान वित्त विभागाच्या दि.१२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार "सशर्त" स्वरुपाचे असून सदर निधी प्राप्त झाल्यानंतर संचालक, मीत्रा यांनी प्रत्यक्ष झालेल्या खर्चाप्रमाणे विहित नमुन्यामध्ये उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत."

४. आहरित केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच लेखाशीर्षाखाली नोंदविली गेली आहे किंवा नाही याची संचालक (वित्त), मजीप्रा यांनी खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे. आहरित केलेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाशी मासिक ताळमेळ घेण्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची राहील.

५. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्र. वाय-५, ३४५१-सचिवालयीन- आर्थिक सेवा, (००)०९०- सचिवालय, (०२)-पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, (०२)(०३)- प्रशिक्षणावरील खर्च (कार्यक्रम) (३४५१ २८७१), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागवावा.

६. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४ /प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात, तसेच ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत निधी वितरणासाठी नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक २२७/कार्यासन १४४३, दि.२०.०३.२०२५ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७३/व्यय-३, दि. २७.०३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार व बीम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. वित्त विभागाच्या उपरोक्त दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

७. सदर अनुदान हे आभासी वैयक्तिक ठेव प्रणालीमार्फत अदा करण्यात यावे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११५०४२१९६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2025.03.31 15:52:18 +05'30'

**(डॉ. रविंद्र भराटे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

५. आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
६. मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
८. संचालक, महाराष्ट्र पर्यावरण व अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मीत्रा), नाशिक.
९. निवडनस्ती, पापु-२३.